सन २०२१-२२ मध्ये केंद्र शासन पुरस्कृत योजनेसाठी राज्य शासनाचा हिस्सा या खालील अनुदानातून महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : टिडीसी २०२१/०३/प्र.क्र.७२०/पर्यटन**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक : १६ मार्च, २०२२

संदर्भ :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१.

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१.

३) महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाचे पत्र क्र मपविम/ बांधकाम/वि.म.वि.यो/ २०२१/ ४५१, दि.२३.९.२०२१

४) महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाचे पत्र क्र मपविम/ बांधकाम/केंद्रीय अर्थसहाय्य/ २०२२/८०५, दि.२४.०२.२०२२

**शासन निर्णय :**

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात "मागणी क्रमांक झेडडी-४, मुख्य लेखाशिर्ष "३४५२ १९०२" केंद्रीय अर्थसहाय्य अंतर्गत करण्यात येणाऱ्या पर्यटनस्थळ विकासासाठी राज्य शासनाचे सहायक अनुदान (कार्यक्रम)" या लेखाशिर्षाखाली रुपये १५००.०० लक्ष इतकी तरतूद असून त्यापैकी ६० % म्हणजेच रुपये ९००.०० लक्ष निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे.

२. खालील तक्त्यामध्ये नमूद केल्यानुसार केंद्रीय पर्यटन मंत्रालयाच्या योजनेअंतर्गत मंजूर असलेल्या पर्यटन विकास प्रकल्पातील कामांसाठी केंद्र शासन पुरस्कृत योजनेतील राज्य शासनाचा हिस्सा म्हणून स्तंभ क्रमांक ७ येथे नमूद केल्याप्रमाणे रुपये ९००.०० लक्ष (रुपये नऊशे लक्ष फक्त) एवढा निधी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास उपलब्ध करुन देण्यास या आदेशान्वये शासन मंजूरी देण्यात येत आहे :-

(रु.लक्षात)

| अ. क्र. | प्रकल्पाचे नाव | प्रकल्पाची किंमत | केंद्र शासनाने प्रकल्पास मंजुरी दिलेल्या आदेशाचा क्रमांक व दिनांक | केंद शासनाकडून आतापर्यंत वितरीत निधी | राज्य शासनाकडून आतापर्यंत वितरीत निधी | २०२१-२२ करीता राज्य शासनाचा हिस्सा म्हणून वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| 1 | Destination Development at Nashik (Gangapur Dam, Nashik, City), Kalagram at Goverdhan (Nashik City and Gondeshwar) as a Mega Project | 2789.51 | No.5/PSW(S8)/2011, dated 31.3.2012 | 1244.27 | 655.00 | 250.00 |
| 2. | Architectural Theme Lighthing at Chhatrapati Shivaji Terminus Mumbai | 516.73 | N0.5PSW(11)/2013 dated 30.08.2013 | 100.00 | ---- | 300.00 |
| 3. | Development Sindhudurg Coastal Circuit under Swadesh Darshan Scheme | 8217.00 | No.11(06)/2015-SD, dated 1.03.2016 | 1643.00 | 400.00 | 150.00 |
| 4. | Development Trimbakeshwa, Dist. Nashik Under PRASAD Scheme | 3781.00 | 5-PRASAD(03)/2017, Dt.23.01.2018 | 1928.00 | 0.00 | 200.00 |
| | | | | | **एकूण** | ९००.०० |

२. <u>अटी व शर्ती</u> :-

१) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

२) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ यांची राहील व जादा खर्चा प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

३) मंजूर तरतुदीतून करावयाचा खर्च ३१ मार्च, २०२२ पर्यंत करण्यात यावा व मंजूर कामे तात्काळ पूर्ण करावीत.

४) ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तीय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेणे आवश्यक आहे.

५) अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/ प्र.क्र.१५/कोषा-प्र ५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा, दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

६) तांत्रिक मान्यता विहित स्तरावर घेण्यात यावी.

७) रस्त्यांच्या प्रस्तावित कामांच्या प्रकरणांमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमावलीचे पालन करणे बंधनकारक राहील.

८) योजनेत्तर स्वरुपाच्या कामासाठी (देखभाल/दुरुस्ती इ.) सदरची तरतूद उपयोगात आणली जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

९) सदर कामांपैकी जी कामे देवस्थान/संस्थेच्या जागेवर करण्यात येणार आहेत अशा कामांसंदर्भात सदर देवस्थान/संस्थेकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच अशा कामाच्या पूर्णत्वानंतर त्या संदर्भातील देखभाल/ दुरुस्ती, संबंधित संस्थेने करण्यासंदर्भात व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ यांनी संबंधित देवस्थान / संस्थेबरोबर करारनामा करणे बंधनकारक राहील. अशा प्रकारच्या देखभाल दुरुस्तीकरीता शासनाकडून यापुढे कोणत्याही प्रकारचा निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही, याची नोंद घेण्यात यावी व तशी अट करारात अंतर्भूत करण्यात यावी. तसेच या कामामुळे निर्माण होणाऱ्या सर्व सुविधा तसेच पर्यटन स्थळ सर्व नागरीकांसाठी खुले राहील, अशी अट करारात समाविष्ट करण्यात यावी.

१०) सदर निधीतून होणाऱ्या खर्चातून करावयाच्या कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे दर महिन्याच्या १० तारखेपर्यंत केंद्र शासनास / पर्यटन संचालनालयास / राज्य शासनास न चुकता सादर करावीत. तसेच काम पूर्ण झाल्यानंतर पूर्णत्वाचा दाखला आणि निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता केंद्र शासनास पर्यटन संचालनालयास / राज्य शासनास सादर करण्यात यावे.

११) सदर काम पूर्ण झाल्यानंतर सदर कामाच्या देखभालीची तसेच इतर अनुषंगिक कामांची जबाबदारी कार्यान्वयीन यंत्रणा व संबंधित संस्था यांची राहील.

३. वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २०२१-२२ आर्थिक या वर्षाकरीता **"मागणी क्रमांक झेडडी-४,** मुख्य लेखाशीर्ष **३४५२-पर्यटन, ००, ०१, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०२) पर्यटन स्थळांचा विकास कार्यक्रम, (०२) (०१) केंद्रीय अर्थसहाय्य अंतर्गत करण्यात येणाऱ्या पर्यटनस्थळ विकासासाठी राज्य शासनाचे सहायक अनुदान (कार्यक्रम) (३४५२ १९०२) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)"** या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. मंजूर करण्यात आलेल्या सहायक अनुदानाची रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता मुख्य लेखाधिकारी, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना -आहरण व संवितरण अधिकारी॰ आणि सह संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना -नियंत्रण अधिकारी॰ घोषित करण्यात येत आहे. सदर निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम त्यांनी अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई या कार्यालयात देयके सादर करुन संबंधितांना तात्काळ वितरीत करावी. सदर कार्यवाहीबाबतचा अनुपालन अहवाल शासनास एक महिन्यात सादर करण्यात यावा.

४. प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१ व वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ अन्वये देण्यात आलेल्या सूचनेनुसार व अधिकाराच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत असून वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ च्या परिशिष्टामधील तपासणीसूची बाबींची व प्रत्येक अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२२०३१६१५१६४४२७२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramesh Jayaram Kadam

Digitally signed by Ramesh Jayaram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=931a917c29ea693ba9abee543d58bf1b6ade60ae69c9be92f59d232bb3a3fcc8, serialNumber=c8fbeb4e149e205d858dabb5d81a2a90a8deb719257572300ef79cfab47d9345, cn=Ramesh Jayaram Kadam
Date: 2022.03.17 15:36:47 +05'30'

**( र. ज. कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
३. महालेखापाल, (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
५. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

६. सह संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

८. मुख्य लेखाधिकारी, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

९. नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.

१०. वित्त विभाग (का.व्यय-१४/अर्थोपाय / अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.

११. अवर सचिव, (अर्थसंकल्प शाखा) पर्यटन व सांस्कृतिक विभाग,मंत्रालय, मुंबई.(यांना आदेशात नमूद करण्यात आलेल्या नियंत्रण अधिकारी, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या ZD००१२ या नियंत्रण सांकेतांकावर निधी वितरीत करण्याच्या विनंतीसह)

१२. निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.

***